शासकीय धान्य गोदामातील अन्नधान्याच्या हाताळणूकीसाठी हमाल कंत्राट निश्चितीबाबत.

# महाराष्ट्र शासन

## अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग

**शासन निर्णय क्रमांक : कंत्राट-१२२१/प्र.क्र. ०८/ना.पु.१६-अ,**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : ०६ मार्च, २०२३.

**वाचा :** (१) उद्योग उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र.भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-६, दि. ०१ डिसेंबर, २०१६.
(२) उद्योग उर्जा व कामगार विभाग, शासन परिपत्रक क्र. युडब्ल्युए १५२००५/(१२३/३)/कामगार-५, दि. २७ मे, २००५.
(३) उद्योग उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. युडब्ल्युए १५२००५/(१२३/३)/कामगार-५, दि. २९ एप्रिल, २००८.
(४) शासन निर्णय क्रमांक : कंत्राट-१२१४/प्र.क्र. १५६/ना.पु.१६-अ, दि. १२ सप्टेंबर, २०१४.
(५) उद्योग उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. युडब्ल्युए २०१५/प्र.क्र.२१८/कामगार-५, दि. ६ सप्टेंबर, २०१६.
(६) शासन परिपत्रक क्र. संकिर्ण-१८१६/प्र.क्र.१६१/ना.पु.१६अ, दि. ३० जानेवारी, २०१७
(७) शासन परिपत्रक क्र. कंत्राट-१२१६/प्र.क्र.१८४/ना.पु.१६अ, दि. ६ जुलै, २०१७.
(८) शासन शुध्दीपत्रक क्र. कंत्राट-१२१७/ प्र.क्र.९८/ नापु.१६ अ, दि.१ ऑक्टोबर, २०१८
(९) सहकार, पणन व वस्त्राद्योग विभाग, शासन निर्णय, क्र. मजूर १२२००४/प्र.क्र.२४/९-स, दि.२१ डिसेंबर, २००४
(१०) शासन निर्णय क्र.कंत्राट-१२१७/ प्र.क्र.९८/नापु.१६ अ, दि.८ मे, २०१८

**प्रस्तावना :-**

राज्यातील शासकीय गोदामातील अन्नधान्याच्या हाताळणूकीसाठी निविदा प्रक्रीयेद्वारे हमाल कंत्राट निश्चित करण्याबाबतचे धोरण विहित करण्यात आलेले आहे. त्यानुसार सन २०१८ ते २०२१ या कालावधीसाठी हमाल कंत्राट निश्चित करण्याबाबत संदर्भ क्र. ८ येथील दि. ०८ मे, २०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आल्या होत्या. त्यानुसार सदर शासन निर्णयाच्या पूर्वीच्या दि.१२.०९.२०१४ च्या शासन निर्णयानुसार कार्यान्वीत असलेली हमाल कंत्राटे रद्द करून सर्व जिल्ह्यांमध्ये नव्याने हमाल कंत्राट निश्चितीसाठी निविदा प्रक्रिया राबविण्याबाबत सूचना निर्गमित केल्या होत्या.

दि.०८.०५.२०१८ च्या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या धोरणानंतरदेखील हमाल कंत्राटे करण्याच्या प्रक्रियेमध्ये क्षेत्रीय स्तरावर संभ्रम निर्माण झाल्याचे निदर्शनास आले असून अपरिहार्य कारणांमुळे काही जिल्ह्यांमध्ये शासन निर्णय, दि.०८.०५.२०१८ नुसार हमाल कंत्राटे कार्यान्वीत होऊ शकलेली नाहीत. तसेच सदर कंत्राटे कोणास द्यावीत याबाबत सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभागाने केलेल्या स्पष्टतेनुसार सदर धोरणामध्ये सुधारणा करणे आवश्यक असल्याची बाबदेखील शासनाच्या निदर्शनास आली आहे. त्यानुसार पुढील कालावधीसाठी शासकीय धान्य गोदामातील

अन्नधान्य हाताळणूकीसाठी हमाल कंत्राट निश्चित करण्याच्या प्रक्रियेमध्ये सुसूत्रता आणण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :**

राज्यातील शासकीय धान्य गोदामांमध्ये अन्नधान्य, साखर, तुरडाळ, भरडधान्य यासारखे धान्य व इतर वस्तु हाताळणूकीसाठी पुढील अटी व शर्तीनुसार नव्याने हमाल कंत्राट निश्चित करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे.

१) सद्यस्थितीत जिल्ह्यातील अन्नधान्याच्या हाताळणूकीचे काम जिल्ह्यातील माथाडी मंडळाकडून करून घेण्यात येत असेल तर शासकीय धान्य गोदामातील अन्नधान्य हाताळणूकीसाठी हमाल कंत्राट निश्चित करण्यासाठी निविदा काढण्याची आवश्यकता नाही.

२) दि.१२ सप्टेंबर, २०१४ च्या शासन निर्णयान्वये हमाल कंत्राटे झालेल्या जिल्ह्यातील हमाल कामगारांना माथाडी मंडळाने ठरवून दिलेल्या दरानुसार नियमित मजूरी मिळत असेल, लेव्हीची रक्कम नियमितपणे माथाडी मंडळाकडे जमा केली जात असेल, माथाडी कायद्यातील तरतूदीनुसार हमाल कामगारांना सर्व सोई उपलब्ध करून दिल्या जात असतील, तसेच माथाडी मंडळाच्या नियमातील अटी व शर्तीचे काटेकोर पालन आणि शासकीय काम विहित वेळेत विना अडथळा पूर्ण करत असतील तर अशा जिल्ह्यातील संबंधित गोदामातील हमाल कामगार संस्थांना विना निविदा मुदतवाढ देण्यात यावी. तसेच त्यावेळी स्पर्धात्मक दरांची कार्यपध्दती नसल्याने सद्यस्थितीत नवीन शासन निर्णयानुसार राज्यात हमाल कंत्राटे झाल्यास त्या महसूल विभागातील ज्या जिल्ह्यांमध्ये कंत्राटे झाली आहेत, त्या कंत्राटामध्ये प्राप्त झालेला न्युनतम दर उपरोक्त विना निविदा मुदतवाढ दिलेल्या संस्थांना मंजूर करण्यात यावा. तथापि, सहकार विभागाच्या दि.२१.१२.२००४ च्या परिपत्रकातील "**सदर हमाल कामगार संस्थांचे कार्यक्षेत्र जिल्ह्यापुरतेच मर्यादीत ठेवावे**", या निकष क्र.८ मधील तरतूदीनुसार सदरहू संस्था ही त्याच जिल्ह्यातील प्रत्यक्ष हमालीचे काम करणारे सदस्य यांची नोंदणीकृत हमाल कामगार सहकारी संस्था व हमाल सदस्य असलेली सहकारी संस्था असणे बंधनकारक राहील.

३) दि.०८ मे, २०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये हमाल कंत्राटे झालेल्या व कंत्राट कालावधी संपलेल्या जिल्ह्यातील हमाल कामगारांना माथाडी मंडळाने ठरवून दिलेल्या दरानुसार नियमित मजूरी मिळत असेल, लेव्हीची रक्कम नियमितपणे माथाडी मंडळाकडे जमा केली जात असेल, माथाडी कायद्यातील तरतूदीनुसार हमाल कामगारांना सर्व सोई सुविधा करून दिल्या जात असतील तसेच माथाडी मंडळाच्या नियमातील अटी व शर्तीचे काटेकोर पालन आणि शासकीय काम विहित वेळेत विना अडथळा पूर्ण करत असतील तर अशा जिल्ह्यातील कार्यरत हमाल कंत्राटदार संस्था कार्यरत स्पर्धात्मक दराने काम करण्यास तयार असतील तर त्यांना पुढील कालावधीसाठी विना निविदा हमाल कंत्राट मंजूर करण्यात यावे. तथापि, सहकार विभागाच्या दि.२१.१२.२००४ च्या

परिपत्रकातील "सदर हमाल कामगार संस्थांचे कार्यक्षेत्र जिल्ह्यापुरतेच मर्यादित ठेवावे," या निकष क्र.८ मधील तरतूदीनुसार सदरहू संस्था ही त्याच जिल्ह्यातील नोंदणीकृत हमाल कामगार संस्था असणे बंधनकारक राहील.

४) वरील (२) आणि (३) नुसार ज्या शासकीय धान्य गोदामातील सद्यस्थितीतील हमाल कंत्राटदार संस्था त्या जिल्ह्यातील स्थानिक संस्था नसेल आणि / किंवा सन २०२३-२०२६ या कालावधीसाठी कार्यरत स्पर्धात्मक दरांवर अन्नधान्य हाताळणूकीचे काम करण्यास तयार नसेल, त्या शासकीय धान्य गोदामांसाठी सदर नवीन शासन निर्णयामधील तरतूदी तसेच अटी व शर्तीनुसार निविदा प्रक्रिया पूर्ण करावी.

५) वर नमूद केलेले मुद्दे वगळता, तसेच स्थानिक परिस्थिती लक्षात घेता, अन्य कोणत्याही कारणांमुळे हमाल कंत्राट नव्याने काढणे गरजेचे आहे असे जिल्हाधिकारी यांचे मत झाल्यास या शासन निर्णयातील तरतूदींच्या आधारे हमाल कंत्राटासाठी निविदा प्रक्रिया राबविण्यास जिल्हाधिकारी सक्षम असतील.

६) संदर्भ क्र. ५ येथील उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या दि. ६ सप्टेंबर, २०१६ रोजीच्या शासन निर्णयानुसार कोणत्याही मंडळाने फक्त वाराईकरीता नव्याने कामगार नोंदित करु नयेत. तसेच भराई, उतराई करण्याच्या कामामध्येच वाराईच्या स्वरुपाच्या कामाचा अंतर्भाव असल्याचे स्पष्ट केलेले असल्याने व शासकीय गोदामात फक्त वराईच्या कामासाठी हमाल कामगारांची स्वतंत्र टोळी कार्यरत नसल्याने यापुढे कोणत्याही प्रकारची वाराई वेगळयाने दिली जाणार नाही. त्याअनुषंगाने कामांच्या बाबीमध्ये बदल करण्यात आला असून पुर्वी **C(२)(१)** अंतर्गत चालणारे काम आता **अ(एक)** म्हणून चालेल तर पुर्वी **ब(५)** अंतर्गत चालणारे काम आता **ब(दोन)** म्हणून चालेल याची नोंद घेण्यात यावी. (कामाच्या तपशीलवार बाबींसाठी सोबतच्या परिशिष्ठातील परिच्छेद क्र. १० कृपया पहावा.)

७) शासकीय गोदामातील अन्नधान्य हाताळणूकीसाठी देण्यात येणारे दर हे प्रति क्विंटलसाठी असतील. (ज्या ठिकाणी पुर्वी प्रति ५० किलोच्या गोणीचे दर / प्रती टन दर / १०० पोत्यांचे दर निश्चित केलेले असतील त्या ठिकाणी ५० किलोच्या दोन गोणींचे दर एकत्र करुन दयावेत) सदरच्या बाबी जिल्हाधिकारी यांनी सर्व निविदाकारांच्या निदर्शनास आणून, निविदा प्रक्रिया राबविताना निविदेतील स्पर्धात्मक दर हे प्रति क्विंटल दराने मागविले जातील याची दक्षता घ्यावी.

८) **हमाली कामाचे आधारभूत दर :-**

जिल्ह्याशी संबंधित माथाडी मंडळाकडून चालू वर्षासाठी निर्धारित केलेले/लागू केलेले हमालीचे दर हे निविदा प्रक्रियेकरीता आधारभूत दर म्हणून विचारात घेण्यात यावेत. यासाठी जिल्ह्याशी संबंधीत माथाडी मंडळास पत्र लिहून ३० दिवसाच्या मुदतीत हमालीचे दर देण्यास बंधन घालावे. उपरोक्त दर प्राप्त करुन घेण्याची संपुर्ण जबाबदारी जिल्हाधिकारी यांची राहिल. माथाडी

मंडळाने दर घोषित करतांना ते किमान वेतनापेक्षा कमी असणार नाहीत, ही बाब विचारात घ्यावी. जिल्हा माथाडी मंडळाना, त्यांना लागु असलेल्या योजनेतील कायदेशीर तरतुदीनुसार हमालीचे मुळ दर व इतर सेवाशर्ती ठरविण्याचे अधिकार आहेत, त्यानुसार मंडळानी कार्यवाही करावी. विभागाने हमाली कामाच्या बाबींमध्ये वाराईच्या कामाचा अंतर्भाव करुन नव्याने कामाच्या बाबी विहित केल्या आहेत, ही बाब विचारात घेऊन संबंधित माथाडी मंडळाने आधारभूत दर निश्चित करावेत.

वरीलप्रमाणे जिल्ह्याच्या माथाडी मंडळाने विहित कामांसाठी चालू वर्षासाठी निर्धारित केलेला हमालीचा **बाबनिहाय आधारभुत दर** व जिल्ह्यातील हमाल कामगारांना **प्रत्यक्ष मिळत असलेला दर** यापैकी जो दर जास्त असेल तो या निविदा प्रक्रियेसाठीचा हमालीचा आधारभूत दर मानण्यात येईल. हमालीचा हा आधारभूत दरच माथाडी कामगारांना देय असेल. हमाल कामगारांना संस्थांना देय असलेल्या आधारभूत दरांवरील स्पर्धात्मक दरावर दावा करता येणार नाही.

**९) निविदा प्रक्रियेसाठीचे निविदाकार संस्थांचे स्पर्धात्मक दर :-**

निविदा प्रक्रिया ही वरीलप्रमाणे विहित हमालीच्या बाब निहाय आधारभुत दरांवरील स्पर्धात्मक दरांवर राबविण्यात येईल. त्यासाठी निविदाकार संस्थांनी हमालीच्या बाबनिहाय आधारभूत दरांवर स्पर्धात्मक दर भरावेत.

निविदाकाराने शासन निर्णयातील सर्व तरतूदी, प्रत्यक्ष खर्च/नफा या बाबी विचारात घेऊन हमाल कामगारांना देय असलेल्या सर्व बाबनिहाय आधारभूत दरांवर एकत्रितरित्या टक्केवारीच्या प्रमाणात निविदेत दर नमूद करणे आवश्यक राहिल. (प्रत्येक बाबनिहाय आधारभूत दरावर वेगवेगळे स्पर्धात्मक दर मागविण्यात येऊ नयेत.)

**१०) कंत्राट कालावधी :-**

जिल्ह्यातील तालुकांतर्गत असलेल्या शासकीय गोदामातील अन्नधान्याच्या हाताळणूकीसाठी हमाल कंत्राटाचा कालावधी ३ वर्षांचा राहिल. ज्या तारखेला निविदाकाराशी करारनामा करण्यात येईल, त्या तारखेपासून कालावधी सुरु होऊन तो पुढील ३ वर्षापर्यंत असेल. जेव्हा आवश्यकता असेल तेव्हा कंत्राटाचा कालावधी दोन महिन्यापर्यंत वाढविण्यात यावा. तद्नंतर मुदतवाढीसाठी शासनाची मंजूरी घेण्यात यावी. मात्र कंत्राट कालावधी संपण्याच्या ३ महिने अगोदर पासून पुढील कालावधीसाठी निविदा प्रक्रिया सुरु करण्यात यावी.

**११) निविदा प्रक्रिया राबविण्याची जबाबदारी:-**

११.१ जिल्ह्यातील तालुकांतर्गत असलेल्या शासकीय गोदामातील (गोदाम निहाय) अन्नधान्याच्या हाताळणूकीसाठी हमाल कंत्राट राबविण्याची खुली ई-निविदा प्रकिया जिल्हास्तरावर जिल्हाधिकारी यांच्याकडून राबविण्यात येईल.

११.२ निविदेचा तांत्रिक लिफाफा उघडणे, निविदाकारास तांत्रिकदृष्ट्या पात्र ठरविणे, दराचा लिफाफा उघडणे व प्रदान केलेल्या अधिकार मर्यादेमध्ये निविदा दर मंजूर करणे इत्यादी अधिकार जिल्हास्तरीय निविदा समितीस असतील.

११.३ खुल्या निविदांसाठी सामान्य प्रशासन विभागाच्या शासन निर्णय क्रमांक मातंसं/नस्ती २०१२/ प्र.क्र.२७३/३९, दिनांक २६ नोव्हेंबर, २०१४ मधील सूचनांनुसार, त्याचप्रमाणे उद्योग उर्जा व कामगार विभागाच्या संदर्भ क्र. १ येथील दि. १ डिसेंबर, २०१६ रोजीच्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार खुली ई-निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी.

११.४ संपूर्ण निविदा प्रक्रिया पूर्ण करणे व दर मंजूर झालेल्या निविदाकाराशी विहित कालावधीत करारनामा करण्याची जबाबदारी जिल्हाधिकारी यांची राहील.

**१२) कंत्राट निश्चितीची कार्यपध्दती :-**

१२.१ निविदाप्रक्रियेमध्ये निविदा भरण्यासाठी संबंधित जिल्ह्यातील प्रथम प्रत्यक्ष हमालीचे काम करणारे सदस्य यांच्या नोंदणीकृत हमाल कामगार सहकारी संस्था व हमाल सदस्य असलेल्या सहकारी संस्थांकडून विस्तृत प्रसिध्दी देऊन खुल्या निविदा मागविण्यात याव्यात.

१२.२ वरील १२.१ मध्ये नमूद नोंदणीकृत हमाल कामगार सहकारी संस्था निविदेमध्ये भाग घेत नसल्यास नोंदणीकृत बेरोजगारांच्या सेवा सहकारी संस्थांकडून खुल्या निविदा मागविण्यात याव्यात.

१२.३ ज्या संस्था सन २००८ किंवा त्यापासुन पुढे शासकीय गोदामातील अन्नधान्य हाताळणूकीचे काम करत आहेत व अशा संस्थाना निविदेमध्ये भाग घ्यावयाचा असेल तर पुर्वीच्या कामाच्या ठिकाणची मजुरी व त्यावरील लेव्ही, ज्या जिल्ह्यांमध्ये मजूरी रोख दिली जात होती अशा जिल्ह्यांच्या बाबतीत मजूरीवरील संपूर्ण लेव्ही, थकीत महागाई निर्देशांक वाढ प्राप्त झालेली असल्यास त्यावरील लेव्ही या संस्थांनी माथाडी मंडळात भरणा केलेली असणे आवश्यक आहे. याबाबतची आवश्यक कागदपत्रे सादर करणे बंधनकारक राहील. अन्यथा अशा संस्थाना निविदा प्रक्रियेत भाग घेता येणार नाही. तसेच ज्या संस्थांनी हमाल कामगारांची आर्थिक देणी न दिल्याबाबत त्यांच्या विरुध्द माथाडी मंडळाने माथाडी कायद्यांतर्गत गुन्हे नोंदविलेले असतील अशा संस्थांना निविदा प्रक्रियेत भाग घेण्यास मज्जाव करावा.

**१३) निविदेच्या पात्रतेचे निकष व अटी-शर्ती :-**

**१३.१ निविदाकाराचा अनुभव :-**

निविदाकार संस्थेतील सभासदांना कोणत्याही गोदामावरील हमाली कामाचा १ वर्षाचा अनुभव असावा. (यामध्ये ट्रकमधून ५० किलोच्या गोण्या उतरविणे, त्यांचे प्रमाणिकरण करणे, त्यांची गोदामामध्ये थप्पी लावणे, गोदामातील थप्पी मोडून गोण्या ट्रकमध्ये थप्पी लावून देणे या प्रकारच्या कामाचा अनुभव अत्यावश्यक आहे).

**१३.२ निविदाकाराची उलाढाल :-**

निविदाकार संस्थेला संबंधित शासकीय गोदामासाठी निविदा भरताना आर्थिक उलाढालीची अट लागू रहाणार नाही.

**१३.३ निविदा अर्ज शुल्क व इसाऱ्याची रक्कम :-**

१३.३.१ निविदा अर्ज शुल्क रु. ५०००/- इतके राहील.

१३.३.२ इसारा रक्कम मागील आर्थिक वर्षात हमाली कामासाठी झालेल्या एकूण खर्चाच्या २ टक्के एवढी घेण्यात यावी.

१३.३.३ इसाऱ्याची रक्कम ऑनलाईन पध्दतीने भरण्यात यावी.

१३.३.४ ज्यांनी इसारा रक्कम भरलेली असेल, त्यांना निविदा भरणे बंधनकारक आहे.

१३.३.५ विनिर्दिष्टीत केलेल्या इसारा रक्कमेपेक्षा कमी रक्कम भरणाऱ्या निविदाधारकाची निविदा अपात्र ठरविण्यात यावी.

१३.३.६ निविदा उघडल्यानंतर न्यूनतम निविदाकाराव्यतिरिक्त उर्वरित सर्व पात्र/अपात्र निविदाधारकांची इसारा रक्कम सात दिवसात परत करण्यात यावी.

१३.३.७ इसारा रकमेवर कुठल्याही प्रकारे व्याज देय राहणार नाही.

१३.३.८ इसारा रक्कम दोन महिन्याच्या आत परत न केल्यास झालेल्या विलंबावर १० टक्के व्याज प्रदेय राहिल व व्याजाची पूर्ण रक्कम विलंबास जबाबदार असणाऱ्या संबंधित अधिकारी / कर्मचारी यांचेकडून वसूल करण्यात यावी.

१३.३.९ निविदाकाराकडून खालील बाबींची पूर्तता न झाल्यास इसाऱ्याची रक्कम जप्त करण्यात येईल.

१) निविदा स्विकारण्याच्या अंतिम दिनांकानंतर निविदा किंवा प्रस्ताव मागे घेणे किंवा त्यात फेरफार करणे,

२) करारावर सही न करणे,

३) निविदा किंवा प्रस्ताव स्विकारण्यात आल्यानंतर करारानुसार कामगिरीसाठी आवश्यक सुरक्षा अनामत न भरणे,

४) निविदा दस्तावेजामध्ये विनिर्दिष्ट केल्याप्रमाणे करारावर सही करण्यापूर्वी कोणत्याही अन्य अटींची पूर्तता न करणे.

**१३.४ अनामत रक्कम :-**

१३.४.१ निविदेसोबत बँक गॅरंटी घेण्यात येऊ नये. मात्र ज्या निविदाकाराची निविदा मंजूर केली आहे त्या निविदाकाराकडून करारनामा करण्यापूर्वी, मागील तीन वर्षात शासकीय गोदामात हमाली कामासाठी झालेल्या एकूण सरासरी खर्चाच्या ३% इतकी अनामत रक्कम खालील पैकी कोणत्याही स्वरुपात घेण्यात यावी.

१) निविदा मागविणाऱ्या प्राधिकाऱ्याच्या शहरात देय असलेल्या व निविदा मागविणाऱ्या प्राधिकाऱ्याच्या नावाने काढलेल्या डिमांड ड्राफ्टद्वारे,

२) कोणत्याही अनुसूचित वाणिज्यिक बँक / राष्ट्रीयकृत बँकेतील कराराच्या कालावधीत वैध राहणाऱ्या बँकेच्या हमीद्वारे.

१३.४.२ बँक गॅरंटीच्या सत्यतेची पडताळणी संबंधित बँकेकडून करण्यात यावी.

१३.४.३ कराराच्या पूर्ण कालावधीसाठी बँक गॅरंटी वैध राहील याची दक्षता घ्यावी.

१३.४.४ निविदेचा निकाल अधिसूचित करण्यात आल्यानंतर, निविदाकाराने पंधरा दिवसाच्या आत अनामत रक्कम सादर करावी. असे न केल्यास, संबंधित कार्यालय निकालाची अधिसूचना रद्द करु शकेल.

**१३.५ प्रतिभूती ठेवीची रक्कम :-**

१३.५.१ज्या निविदाकाराची निविदा मंजूर केली आहे त्या निविदाकाराची इसारा रक्कम प्रतिभूती ठेवीमध्ये परावर्तीत करण्यात यावी.

१३.५.२ प्रतिभूती ठेवीच्या रक्कमेवर कुठल्याही प्रकारचे व्याज देय राहणार नाही.

**१३.६ बँक गॅरंटी व प्रतिभूती ठेव यांचा वापर खालील परिस्थितीत करण्यात यावा:-**

१३.६.१ निविदाकाराने अन्नधान्य हाताळणूकीचे काम अचानक थांबविल्यास पर्यायी व्यवस्थेकरिता आलेल्या खर्चाची वसूली,

१३.६.२ निविदाकारावर आकारण्यात आलेला दंड वसूल करण्याकरिता अन्य पर्याय शिल्लक नसल्यास,

१३.६.३ निविदाकाराचा हमाल ठेका संपलेला आहे परंतु त्याच्याकडून काही येणे आहे, वसूली आहे, ती वसूल करण्यासाठी अन्य पर्याय नसतील अशा वेळी सदर रक्कम प्रतिभूती ठेवी व बँक गॅरंटीमधून वसूल करण्यात यावी.

**१४) निविदा पध्दती – द्वि लिफाफा पध्दती:-**

१४.१ ई-निविदेसाठी अनुसरावयाची कार्यपद्धती आणि मार्गदर्शक सूचना http://mahatenders.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध आहेत. त्यानुसार कार्यवाही करण्यात यावी.

१४.२ निविदेकरीता द्वी लिफाफा पद्धतीचा अवलंब करण्यात येईल. यामध्ये पहिला लिफाफा हा तांत्रिक लिफाफा असेल ज्यामध्ये निविदाकाराची पात्रता सिद्ध करणारे पुरावे व निविदेच्या अटी व शर्ती मान्य असल्याचे स्वाक्षरीत केलेले दस्तऐवज असतील. दुसरा लिफाफा हा दरविषयक लिफाफा असेल ज्यात निविदाकार आपले दर नमुद करेल.

१४.३ निविदेमध्ये कोणतेही अटीयुक्त दर स्विकारण्यात येणार नाहीत.

१४.४ निविदेची रक्कम विचारात घेऊन उद्योग उर्जा व कामगार विभागाच्या संदर्भ क्र. १ येथील दि. १ डिसेंबर, २०१६ रोजीच्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार निविदा कालावधी निश्चित करावा.

१४.५ तांत्रिक लिफाफा "अ" मध्ये पुढील कागदपत्रे सादर करावीत.

लिफाफा "अ" मध्ये (तांत्रिक लिफाफा) सादर करावयाच्या कागदपत्रांची सूची

| अ.क्र. | कागदपत्रांची सुची |
|---|---|
| १ | संस्थांचा नोंदणी दाखला व नियमावलीची सत्यप्रत. |
| २ | निविदा प्रसिध्द झालेल्या जिल्ह्यात संस्था माथाडी मंडळाकडे मालक म्हणून नोंदीत असल्याबाबतचे प्रमाणपत्र. |
| ३ | जीवनावश्यक वस्तु अधिनियम १९५५, महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम १९६० व महाराष्ट्र माथाडी हमाल व इतर श्रमजीवी कामगार (नोकरीचे नियमन व कल्याण) अधिनियम १९६९ खाली गुन्हा दाखल होऊन दंड अथवा शिक्षा झाली नसल्याबाबतचे शपथपत्र. |
| ४ | शासन निर्णयातील सर्व तरतूदी, अटी व शर्ती मान्य असल्याबाबतचे व त्यास बांधील असल्याचे, तसेच निविदेमध्ये सादर केलेली माहिती बरोबर असुन ती चुकीची असल्याचे सिध्द झाल्यास शिक्षेस बांधिल असल्याबाबतचे शपथपत्र. |
| ५ | निविदाकाराचा PAN क्रमांक अथवा TAN क्रमांक, कागदपत्रांची साक्षांकित प्रत |
| ६ | अनुभव प्रमाणपत्र  व आर्थिक उलाढाल दर्शविणारे सनदी लेखापालाचे प्रमाणपत्र व ज्या ठिकाणी अनुभवामध्ये नियतन विचारात घेतले असेल अशा ठिकाणी जिल्हा पुरवठा अधिकारी अथवा गोदामाशी संबंधित जबाबदार समकक्ष अधिकारी यांचे प्रमाणपत्र (परिच्छेद (९.१) व (९.२) नुसार), तसेच उपरोक्त प्रमाणपत्र काळातील संस्थेच्या लेखापरिक्षण अहवालाची सनदी लेखापालाकडून प्रमाणित केलेली प्रत. |
| ७ | संस्थेच्या सभासदांची यादी |
| ८ | ज्या संस्था सन २००८ किंवा त्यापासुन पुढे शासकीय गोदामातील अन्नधान्य हाताळणूकीचे काम करत आहेत, अशा संस्थानी पुर्वीच्या कामाच्या ठिकाणची मजुरी वरील संपुर्ण लेव्ही ,ज्या जिल्ह्यांमध्ये मजूरी रोख दिली जात होती अशा जिल्ह्यांच्या बाबतीत मजूरीवरील संपूर्ण लेव्ही व थकीत महागाई निर्देशांक वाढ प्राप्त झालेली असल्यास, त्यावरील संपुर्ण लेव्ही माथाडी मंडळात भरणा केल्याबाबतचे माथाडी मंडळाचे विधीग्राह्य प्रमाणपत्र. |

१४.६ तांत्रिक लिफाफा "अ" मधील कागदपत्रांची पूर्तता निविदा सादर करताना पूर्ण करण्यात यावी. तांत्रिक लिफाफा उघडल्यानंतर ऐनवेळी कोणत्याही प्रकारची नवीन कागदपत्रे स्विकारण्यात येऊ नयेत. तांत्रिक लिफाफ्यातील कागदपत्रात व अटी/शर्तीत नमूद केलेल्या अर्हतेपेक्षा कमी अर्हता आढळल्यास निविदा अपात्र ठरविण्यात यावी.

१४.७ शासनाला स्पर्धात्मक दर प्राप्त होण्यासाठी खऱ्याखुऱ्या निविदाकारांना जास्तीत जास्त संख्येने निविदांमध्ये सहभागी होण्याची संधी देणे आवश्यक आहे. हा दृष्टीकोन ठेऊन विहित केलेल्या अत्यावश्यक कागदपत्रांमध्ये काही किरकोळ स्वरुपाच्या त्रुटी असतील (उदा. शपथपत्रे, सांक्षांकित नसलेली कागदपत्रे इत्यादी) व अशा त्रुटीची पूर्तता करण्यासाठी ७ दिवसांची मुदत निविदाकारांना द्यावी. अशा त्रुटी या वेळेत पूर्ण करता आल्या नाहीत तर मात्र ती निविदा अपात्र  ठरवावी.

१४.८ निविदा प्रक्रियेदरम्यान तांत्रिक लिफाफा "अ" उघडल्यानंतर व वरील १०.७ नुसारची

कार्यवाही पुर्ण झाल्यावर व्यापारी दराचा लिफाफा "ब" उघडण्यापुर्वी कोणत्याही निविदाधारकांचे तांत्रिक लिफाफ्यासंदर्भात कोणतेही आक्षेप असल्यास अशा निविदाधारकांनी २ दिवसात लेखी आक्षेप घ्यावेत, त्यानंतर कोणतेही आक्षेप मान्य करु नयेत. तसेच कोणत्याही परिस्थितीत तोंडी आक्षेप मान्य करण्यात येवू नयेत.

१४.९ निविदाधारकांकडून लिफाफा “अ” म्हणजे तांत्रिक लिफाफ्यात आवश्यक असलेली कागदपत्रे सादर न केल्यास सदरची निविदा अपात्र ठरविण्यात यावी. अशा निविदेचा लिफाफा "ब" उघडण्यास अपात्र ठरत असल्याने, संबंधित निविदाधारकाची लिफाफा "ब" उघडण्याची व त्यातील दर विचारात घेण्याची लेखी किंवा तोंडी आग्रह / विनंती कोणत्याही परिस्थितीत ग्राह्य धरण्यात येवू नये.

१४.१० निविदा प्रक्रियेदरम्यान तांत्रिक लिफाफा “अ” उघडल्यानंतर निविदाधारकांचे तांत्रिक लिफाफ्या संदर्भात कोणतेही आक्षेप नसल्यास सर्व पात्र व अपात्र निविदाधारकांकडून आक्षेप नसल्याबाबत तसे लेखी घ्यावे. आक्षेप असल्यास त्यांचे निराकरण करुन दराचा लिफाफा उघडण्यात यावा. लिफाफा "ब" उघडल्यानंतर प्राप्त झालेल्या आक्षेपांचा विचार करण्यात येऊ नये.

१४.११ निविदा अथवा निविदेमध्ये कोणतीही अट अथवा पर्याय निविदाधारकास देता येणार नाही. अशा अटीयुक्त निविदा अपात्र ठरविण्यात याव्यात.

१४.१२ प्रथम निविदेअंती तांत्रिकदृष्ट्या (तांत्रिक कागदपत्रांच्या तपासणीअंती) ३ पेक्षा कमी ग्राह्य निविदा प्राप्त झाल्यास फेर निविदा काढण्यात याव्यात.

१४.१३ फेर निविदा कालावधीच्या अंतिम दिनांकापर्यंत ३ पेक्षा कमी निविदाकार सहभागी झाल्याचे दिसून आल्यास निविदा प्रक्रियेस किमान ०७ दिवसांची पहिली मुदतवाढ देण्यात यावी. यावेळीही ३ पेक्षा कमी निविदा प्राप्त झाल्यास, निविदा सादर करण्यास पुन्हा ०७ दिवसांची दुसरी मुदतवाढ देण्यात यावी. दोन्ही मुदतवाढीनंतर तीन किंवा त्यापेक्षा अधिक निविदा प्राप्त झाल्यास लिफाफा "अ" व त्यात पात्र ठरलेल्या निविदाकारांचा लिफाफा "ब" उघडण्याची कार्यवाही निविदा मागविणाऱ्या अधिकाऱ्याने करावी.

मुदतवाढीनंतरही ३ पेक्षा कमी मात्र किमान १ निविदा प्राप्त झाल्यास सदर निविदा उघडून त्यातील तांत्रिक कागदपत्रांच्या तपासणीअंती ती योग्य असल्यास निविदा उघडणाऱ्या अधिकाऱ्याने म्हणजे जिल्हाधिकारी यांनी त्यांच्या वरिष्ठ अधिकाऱ्यांसमोर म्हणजेच विभागीय आयुक्त यांच्यासमोर "दराचा" लिफाफा "ब" उघडावा व त्यावर त्यांची स्वाक्षरी घेऊन स्वतंत्रपणे निर्णय घ्यावा.

१४.१४ निविदाकाराने शासन निर्णयातील सर्व तरतूदी, प्रत्यक्ष खर्च / नफा या बाबी विचारात घेऊन हमाल कामगारांच्या बाब निहाय आधारभूत दरांच्या टक्केवारीच्या प्रमाणात स्पर्धात्मक दर निविदेत नमूद करावेत. मागाहून दरातील बदलाबाबतची विनंती अथवा कोणत्याही

प्रकाराच्या तक्रारीची दखल घेण्यात येणार नाही. तसेच हमाल कामगारांना द्यावयाच्या दराबाबत कोणतेही न्यायिक प्रकरण उद्‌भवल्यास त्यांची सर्वस्वी जबाबदारी निविदाकाराची राहील.

**१५) निविदा मंजुरीचे प्राधिकार व कार्यपद्धती:-**

निविदाप्रक्रिया पारदर्शी पद्धतीने राबविण्यासाठी व वाजवी दर मंजुर होण्याकरीता खालीलप्रमाणे समित्यांची स्थापना करण्यात येत आहे.

**१५.१ जिल्हास्तरीय समिती:-**

जिल्हास्तरावर हमालीच्या बाबनिहाय आधारभूत दरांवर २५ टक्क्यांपर्यंत स्पर्धात्मक दरांच्या निविदा मंजुर करण्यास जिल्हास्तरीय समिती सक्षम असेल.

१५.१.१ जिल्हास्तरीय समितीची रचना पुढीलप्रमाणे असेल :

| | | |
|---|---|---|
| १ | जिल्हाधिकारी | अध्यक्ष |
| २ | जिल्हा पुरवठा अधिकारी | सदस्य सचिव |
| ३ | जिल्हा कोषागार अधिकारी | सदस्य |
| ४ | जिल्ह्याच्या माथाडी मंडळाचे अध्यक्ष | सदस्य |

१५.१.२ निविदा उघडल्यानंतर न्यूनतम निविदेतील स्पर्धात्मक दर हे हमालीच्या बाबनिहाय आधारभूत दरांच्या २५ टक्केपेक्षा जास्त असल्याचे दिसून आल्यास सदर प्रस्ताव योग्य कारणमिमांसेसह राज्य स्तरावरील समितीकडे एका आठवड्याच्या आत सादर करावेत.

१५.१.३ जिल्हास्तरीय समितीने निविदा उघडल्याच्या दिनांकापासून एका कॅलेंडर महिन्याच्या आत हमालीच्या बाबनिहाय आधारभूत दरांवर **२५** टक्के या मर्यादेपर्यंत निविदा मंजूर करावी. एक महिन्याच्या आत निर्णय न झाल्यास प्रकरण शासनाकडे सादर करावे.

१५.१.४ दर मंजुर करताना ठेकेदाराची मक्तेदारी असणे, तीन पेक्षा कमी निविदा प्राप्त होणे, म्हणजेच स्पर्धेचा अभाव असणे, निविदाकारांनी कार्टेल तयार करणे इ. बाबींमुळे दर जास्त आलेले नाहीत याची समितीने खात्री करुन तसा अभिप्राय नोंदवावा व हे दर मार्केट दरापेक्षा जास्त नसल्याची खात्री करुन **२५** टक्क्याच्या मर्यादेमध्ये दर मंजुर करावेत.

**१५.२ राज्यस्तरावरील समिती:-**

हमालीच्या बाबनिहाय आधारभूत दरांवर **२५** टक्केपेक्षा जास्त दर प्राप्त झालेल्या निविदांना मंजूरी देण्याचे अधिकार राज्यस्तरीय समितीस राहतील.

१५.२.१ राज्यस्तरावरील समिती पुढीलप्रमाणे असेल.

| | | |
|---|---|---|
| १ | सचिव, अनापुवग्रासंवि | अध्यक्ष |
| २ | सह/उप सचिव (नापु-१६ अ) | सदस्य सचिव |
| ३ | वित्तीय सल्लागार व उप सचिव | सदस्य |
| ४ | सह/उप सचिव, वित्त विभाग | सदस्य |
| ५ | सह/उप सचिव, कामगार विभाग | सदस्य |

१५.२.२ असे दर मंजुर करण्यापुर्वी समिती जिल्हा स्तरावरील समितीचा अहवाल प्राप्त करुन घेईल व प्राप्त परिस्थितीत व्यवहारीक पातळीवर किती दर असले पाहिजे याचा अभ्यास करुन समिती निर्णय घेईल.

**१६) निविदेतील दरांची विधीग्राह्यता:-**

निविदा उघडल्यानंतर दराबाबतचा कोणताही बदल स्विकारण्यात येऊ नये. सर्व निविदाकारांची दरपत्रके निविदा उघडण्याच्या तारखेपासून १२० दिवस विधीग्राह्य राहतील. मात्र या कालावधीमधून निविदा प्रक्रियेबाबत न्यायालयीन प्रकरण उद्भवल्यास त्यासाठी लागणारा कालावधी वगळण्यात येईल.

**१७) जिल्हा पुरवठा कार्यालय व हमाल कंत्राटदार संस्थांच्या जबाबदाऱ्या :-**

१७.१ हमाल कामगारांचे वेतन (मजुरी) व कंत्राटदाराचे निविदेतील मंजूर स्पर्धात्मक दर याची वेगवेगळी देयके कंत्राटदार संस्थेस अदा करण्यात यावीत.

१७.२ अ) हमाल कंत्राटदार संस्थानी, माथाडी कायद्यातील तरतुदीनुसार नोंदीत हमाल कामगारांची मजूरी प्रत्येक महिन्याच्या ५ तारखेपर्यंत माथाडी मंडळात ऑनलाईन पध्दतीने अथवा धनाकर्षाद्वारे जमा करणे बंधन कारक राहिल.

ब) त्याचप्रमाणे जिल्हा पुरवठा अधिकारी/ अन्नधान्य वितरण अधिकारी यांनी नोंदीत हमाल कामगारांची जिल्हा माथाडी मंडळाने घोषित केलेली लेव्हीची रक्कम प्रत्येक महिन्याच्या १५ तारखेपर्यंत माथाडी मंडळाकडे ऑनलाईन पध्दतीने अथवा धनाकर्षाद्वारे जमा करणे बंधनकारक राहिल.

क) मजूरीच्या रक्कमेची अदायगी (प्रतिपुर्ती) हमाल कंत्राटदार संस्थेस जिल्हा पुरवठा अधिकारी / अन्नधान्य वितरण अधिकारी यांनी १० करावी.

**माथाडी मंडळाकडून हमालांचे वेतन त्यांच्या बचत खात्यावर ऑनलाईन जमा करणे अभिप्रेत आहे. यानुसार कार्यवाही होत आहे, तसेच नोंदणीकृत हमाल कामगारांना रोख वेतन दिले जात नाही, याची संपूर्ण जबाबदारी जिल्हा पुरवठा अधिकाऱ्यांची राहील.**

१७.३ माथाडी कायद्यातील तरतूदीनुसार माथाडी मंडळाकडे जमा करण्यात येणाऱ्या लेव्हीच्या रकमेतून माथाडी कामगारांसाठी माथाडी कायदा व त्या खालील योजनेनुसार सामाजिक सुरक्षितता व कल्याणकारी योजनेचे फायदे माथाडी मंडळाने उपलब्ध करून देणे आवश्यक आहे. जिल्हा पुरवठा अधिकारी/ अन्नधान्य वितरण अधिकारी यांनी माथाडी मंडळाकडे जमा करण्यात येणाऱ्या लेव्हीच्या रकमेतून बाबनिहाय खर्चाचे विनियोजन करण्यात आले आहे किंवा कसे याबाबतचे प्रमाणपत्र प्राप्त झाल्याशिवाय पुढील महिन्याच्या लेव्हीची अदायगी माथाडी मंडळाकडे करू नये. बाबनिहाय खर्चाचे विनियोजनाबाबतचे प्रमाणपत्र माथाडी

मंडळाकडून प्राप्त होईल याची दक्षता जिल्हा पुरवठा अधिकारी/ अन्नधान्य वितरण अधिकारी यांनी घ्यावी.

१७.४ कंत्राटदार संस्थेने मजुरीची रक्कम विहित वेळेत न भरल्यास प्रथम वेळेस संस्थेस लेखी समज देण्यात यावी. द्वितीय वेळी संस्थेने सदरच्या रक्कमेचा भरणा विहित वेळेत न केल्यास नोटीस देऊन संस्थेस देण्यात येणाऱ्या बाबनिहाय आधारभूत दरावरील स्पर्धात्मक दरातून २५% रक्कम दंड म्हणून कपात करण्यात यावी. तृतीय वेळी संस्थेने सदरच्या रक्कमा विहित वेळेत न भरल्यास संस्थेस नोटीस देऊन कंत्राट रद्द करावे व पुढील वर्षभर संस्थेस शासकीय गोदामातील हमाल कंत्राट निविदा प्रक्रियेत भाग घेण्यास मज्जाव करावा. मात्र उपरोक्त प्रमाणे कार्यवाही करतांना जिल्हा पुरवठा कार्यालयाकडून संस्थेस देय असलेली देणी वेळीच दिलेली असणे आवश्यक राहील, याची नोंद घ्यावी.

१७.५ हमाल कामगार संस्थांना देयके सादर करण्यासाठी जिल्हाधिकारी यांनी निश्चित दिनांक ठरवून दयावा. त्यासाठी प्रत्येक आठवडयाच्या शेवटी व महिना पुर्ण झाल्यावर गोदामपालाने हमाल कंत्राटदार संस्थेस L रजिस्टर उपलब्ध करुन दयावे. त्याप्रमाणे कार्यवाही न झाल्यास गोदामपालास जबाबदार धरुन त्याच्याविरुध्द कारवाई करण्यात यावी. हमाल कंत्राटदार संस्थानी तहसिलदार यांच्याकडे देयके सादर केल्यावर तहसिलदार कार्यालयाने त्याच दिवशी अथवा फार तर दुसऱ्या दिवशी देयके जिल्हा पुरवठा कार्यालयाकडे सादर करणे आवश्यक आहे. त्याप्रमाणे कार्यवाही न झाल्यास संबंधित कर्मचाऱ्याची व तहसिलदार यांची जबाबदारी निश्चित करण्यात यावी.

जिल्हा पुरवठा कार्यालयाकडे सादर करण्यात येणाऱ्या हमाली कामाच्या देयकांचे प्रदान प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पूर्ण करावे. आर्थिक तरतूद उपलब्ध असताना देयके अदा करण्यास विलंब झाल्यास याबाबत जिल्हा पुरवठा अधिकारी व जिल्हा पुरवठा कार्यालयातील सहाय्यक लेखाधिकारी यांना जबाबदार धरण्यात येईल. सादर केलेल्या देयकांमध्ये त्रुटी असल्यास त्रुटीची पुर्तता होऊन देयक मंजुर होईपर्यंत, देयकाच्या ८० टक्के रक्कम हमाल कंत्राटदार संस्थांना आगाऊ प्रदान करावीत.

संस्थाकडून सादर केलेल्या देयकांमध्ये त्रुटी आढळल्यास सर्व त्रुटी एकाच वेळी संस्थेस कळवाव्यात. वारंवार त्रुटी काढणे टाळावे. तसेच संस्थेचे चेअरमन/सचिव यांना बोलावून घेऊन त्रुटींची पुर्तता तात्काळ करुन घ्यावी.

१७.६ प्रत्येक वर्षीच्या मार्च महिन्यामध्ये महागाई निर्देशांकानुसार दरवाढ परिगणित झाल्यावर दरातील वाढीनुसार त्यापुढील कालावधीची मासिक देयके निघतील, त्यासाठी संबंधित गोदामपालाकडे दरांमध्ये झालेली सुधारणा तातडीने कळविण्यात येईल. जेणे करुन प्रत्येक महिन्यात तयार होणारी हमालीची देयके ही महागाई निर्देशांकानुसार झालेल्या वाढीसह

सादर होतील व हमाल कामगारांना महागाई निर्देशांकाच्या वाढीसह वेतन मिळेल याची जबाबदारी जिल्हा पुरवठा अधिकारी यांची राहील.

१७.७ कंत्राट मंजूर झालेल्या संबंधित संस्था / कंत्राटदार यांना माथाडी मंडळाच्या सर्व अटी व शर्ती लागू राहतील. जिल्हाधिकारी / जिल्हा पुरवठा अधिकारी यांना माथाडी मंडळात मुख्य मालक म्हणून नोंदीत होणे माथाडी कायद्यानुसार बंधनकारक राहिल. कंत्राटदाराने माथाडी कायदा व योजनेतील तरतुदीचे उल्लंघन केल्यास मुख्य मालक माथाडी कायद्यातील तरतुदीचे अनुपालन माथाडी मंडळाच्या सुचनेनुसार करेल.

१७.८ शासकीय गोदामातील अन्नधान्य हाताळणूकीचे काम "अत्यावश्यक सेवेमध्ये" येत असल्याने, संबंधित कामगारांना संप / काम बंद आंदोलन इत्यादी प्रकारे कामात व्यत्यय आणता येणार नाही. अशा प्रकारे कामात व्यत्यय आणणाऱ्या कामगाराबाबत कंत्राटदार संस्थेने / माथाडी मंडळाने नोंदणी रद्द करणेबाबत माथाडी कायद्यातील तरतुदीनुसार तातडीने कार्यवाही करावी. या संबंधीची सर्व जबाबदारी कंत्राटदार संस्था / माथाडी मंडळाची राहिल. वरील बाबींबाबत जिल्हाधिकारी यांनीही वेळोवेळी योग्य ती दक्षता घ्यावी.

१७.९ संबंधित कंत्राटदार संस्था यांना मंजूर कंत्राट कालावधीत माथाडी मंडळाच्या नियमातील अटी व शर्तींचे काटेकोरपणे पालन करणे बंधनकारक राहील. ज्या कंत्राटदार संस्था यांचे कोटेकोरपणे पालन करणार नाहीत किंवा शासकीय कामामध्ये अडथळे आणतील त्या कंत्राटदार संस्थेचे काम तात्काळ बंद करुन, करारनामा रद्द करण्यात यावा. त्यानंतर नवीन निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी. तोपर्यंत परिच्छेद २१ नुसार कार्यवाही करण्यात यावी.

१७.१० शासकीय गोदामातील कामामध्ये सातत्य रहावे, त्याचप्रमाणे ते हमालांच्या कमतरतेमुळे / अनुपस्थितीमुळे खोळंबून राहू नये, यासाठी आवश्यक ते हमाल कामगार उपलब्ध करुन देण्याची विनंती माथाडी मंडळाकडे करण्यात यावी. गोदामामध्ये कामाच्या दिवशी आलेल्या ट्रकमधील अन्नधान्य कोणत्याही परिस्थितीत त्याचदिवशी गोदामात रिकामे करून घेण्यासाठी वाहतूक कंत्राटदार व हमाल कंत्राटदार यांनी योग्य तो समन्वय ठेवून धान्य उतरवून घेण्यासाठीचे नियोजन करावे. यासाठी माथाडी मंडळाकडून अतिरिक्त नोंदीत हमाल कामगारांचा पुरवठा न झाल्यास तात्पुरत्या स्वरूपात तातडीने हमाल उपलब्ध करून देण्याची जबाबदारी संबंधित हमाल कंत्राटदार संस्थेची राहील.

नोंदीत नसलेल्या माथाडी कामगारांची माथाडी मंडळाकडे नोंद करण्याबाबतची कार्यवाही तातडीने पुर्ण करण्याबाबतची जबाबदारी हमाल कंत्राटदार संस्थेची राहील.

१७.११ शासकीय गोदामामध्ये अन्नधान्याचे प्रमाणिकरण हे हमाल कामगारांमार्फत करण्यात येते. प्रमाणिकरणामध्ये प्रत्येक गोणी ही ५० किलो धान्याची बनविली जाते. सदर प्रमाणिकरणाच्या अचुकतेबाबत यापुढे गोदामपाला बरोबरच हमाल कंत्राटदार संस्थेसही जबाबदार धरण्यात

यावे. यासाठी L रजिस्टर, E रजिस्टर व E-१ रजिस्टरवर संस्थेचा सुपरवायझर / लिपिक / संस्थेने नियुक्त केलेली व्यक्ती यांची सही घेण्यात यावी.

१७.१२ ज्या संस्थेची हमाल कंत्राटदार म्हणून निवड करण्यात येईल, त्या संस्थेने करारनामा करण्यापूर्वी शासकीय गोदामात प्रत्यक्ष काम करत असलेल्या हमालांची माथाडी मंडळाकडे नोंदणी करुन घेणे व त्यांना ओळखपत्र देणे बंधनकारक राहील.

**१८) वाटाघाटी करण्याबाबत :-**

एल-१ व्यतिरिक्त अन्य कोणाशीही वाटाघाटी करण्यात येणार नाहीत. एल-१ सोबत करण्यात येणाऱ्या वाटाघाटी देखील उद्योग, उर्जा व कामगार विभागाच्या दि. १ डिसेंबर, २०१६ रोजीच्या शासन निर्णयातील परि.४.४.४.१ मधील तरतूदीनुसार करण्यात येतील.

**१९) निविदाकाराने करारनामा न केल्यास:-**

१९.१ मंजूर निविदाकारास निविदा मंजूरीनंतर ७ दिवसाचे आत सर्व कागदपत्रांची पूर्तता करुन रुपये १००/- च्या स्टँम्प पेपरवर विहित नमुन्यात करारनामा करणे बंधनकारक आहे.

१९.२ प्रथम न्यूनतम निविदाकार करारनामा करण्यास असमर्थ ठरल्यास निविदाप्रक्रिया रद्द करुन फेरनिविदा बोलाविण्यात येतील. अशा फेरनिविदा प्रक्रियेत पहिल्या निविदेत करारनामा करण्यास नकार देणाऱ्या निविदाकारास प्रतिबंधित करण्यात येईल.

१९.३ निविदा सादर केल्यानंतर निविदाकार हा निविदेच्या तसेच करारनाम्यातील तरतूदींना बांधील राहिल. न्यूनतम दर असलेल्या निविदाकाराने करारनामा करण्यास नकार दिल्यास अथवा टाळाटाळ केल्यामूळे अथवा आदेश देवूनही काम न केल्यामूळे, अथवा फेर निविदा मागवून मंजूर केल्यामूळे, शासनाने खर्च करावयाची अतिरिक्त रक्कम, स्टेट बँक ऑफ इंडियाच्या **"पी.एल. आर. (Prime Lending Rate) अधिक दोन टक्के"** व्याजासह करारनामा न केलेल्या निविदाकाराकडून वसूल करावी. सदर वसूली जमीन महसुलीच्या थकबाकीची वसूली म्हणून करण्यात यावी.

**२०) करारनाम्यास मंजूरी:-**

२०.१ शासनाच्या वतीने निविदाकारासोबत करारनामा करण्यासाठी जिल्हाधिकारी यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

२०.२ या शासन निर्णयानुसार खुली ई-निविदा प्रक्रिया राबवून निविदा मंजूर करण्यात आलेल्या निविदाकारासोबत करण्यात येणाऱ्या करारनाम्यास या शासन निर्णयातील सर्व तरतूदी लागू राहतील. तसे करारनाम्यात नमूद करण्यात यावे.

२०.३ करारनाम्यावर जिल्हाधिकारी / जिल्हा पुरवठा अधिकारी व कंत्राटदार यांनी स्वाक्षरी करणे आवश्यक राहील.

२०.४ करारनाम्याच्या प्रत्येक पानावर व दुरुस्तीच्या ठिकाणी जिल्हाधिकारी / जिल्हा पुरवठा अधिकारी व कंत्राटदार यांनी स्वाक्षरी करणे आवश्यक राहील.

**२१) कंत्राटदार काम करण्यास अपयशी ठरल्यास करावयाची कार्यवाही :-**

शासकीय गोदामातील अन्नधान्य हाताळणूकीचा कंत्राटदार काम करण्यास अपयशी ठरल्यास किंवा करारनाम्याच्या कालावधीपूर्वी कंत्राट रद्द करण्यात आल्यास नवीन कंत्राट निश्चित होईपर्यंत अन्नधान्य हाताळणूकीसाठी खालील पर्यायानुसार तात्पुरती व्यवस्था करावी.

(अ) लगतच्या शासकीय गोदामातील कंत्राटदाराकडून न्यूनतम दराने अन्नधान्य हाताळणूकीचे काम करण्यात यावे.

(ब) नोंदणीकृत हमाल कामगार सहकारी संस्थेकडून दरपत्रके मागविण्यात यावीत. स्पर्धात्मक दर प्राप्त होण्यासाठी कमीत कमी ३ संस्थांकडून दरपत्रके प्राप्त होणे आवश्यक आहे. प्राप्त होणाऱ्या दरपत्रकातील सर्वात कमी दर वाटाघाटी करुन स्विकारण्यात यावेत. मात्र सदरचे दर हे रद्द करण्यात आलेल्या कंत्राटदार संस्थेच्या दरापेक्षा जास्त नसावेत.

(क) शासकीय गोदामातील अन्नधान्य हाताळणूकीचे काम जिल्हाधिकारी कार्यालयाकडून करण्यात यावे.

**२२) आयकर कपात करण्याबाबत:-**

भारत सरकारच्या वित्त मंत्रालयाच्या दि. ०८.१०.१९९३ च्या परिपत्रकातील परिच्छेद क्र. ५.३ नुसार सर्व प्रकारच्या कंत्राटांना आयकर अधिनियम १९६१ च्या कलम १९४(सी) ची तरतुद लागू आहे. त्यानुसार वित्तीय सल्लागार व उपसचिव यांच्याकडील परिपत्रक क्र. का-१/३९८/७९२२, दिनांक ९ डिसेंबर, १९९६ अन्वये हमाली कामाच्या देयकातून केंद्र शासनाच्या प्रचलित नियमानुसार आयकर कपात करण्यात यावी.

**२३) प्रारुप करारनामा:-**

अन्नधान्य हाताळणूकीच्या कंत्राटासाठी करावयाचा प्रारुप करारनामा सोबत (परिशिष्ट-अ) जोडला आहे. जिल्हाधिकारी यांनी सदर प्रारुप करारनाम्यानुसार करारनामा करावा. इतर कोणत्याही अटी व शर्ती नव्याने नमूद करण्यात येऊ नयेत.

२४) सदर शासन निर्णयान्वये दि. १२ सप्टेंबर, २०१४ आणि दि.०८ मे, २०१८ रोजीचे शासन निर्णय अधिक्रमित करण्यात येत आहेत.

२५) या शासन निर्णयानुसार होणाऱ्या हमाल कंत्राटामध्ये लेव्ही भरण्याची जबाबदारी जिल्हा पुरवठा अधिकारी/ अन्नधान्य वितरण अधिकारी यांच्यावर सोपविण्यात येत आहे.

**२६) करारनाम्यातील तरतूदीसंदर्भात वाद विवाद व अपिल :**

२६.१ करारनाम्याच्या कालावधीत किंवा तद्नंतर करारनाम्यातील तरततूदीसंदर्भात तसेच दंड, वसूली, कंत्राट रद्द करणे इ. संदर्भात जिल्हाधिकारी यांनी दिलेल्या निर्णयाविरुध्द निर्णय दिल्याच्या दिनांकापासून ३० दिवसात कंत्राटदार संस्थेस संबंधित विभागीय आयुक्त यांचेकडे दाद मागता येईल.

२६.२ विभागीय आयुक्त यांच्या निर्णयाने समाधान न झाल्यास, सदर आदेश पारित झालेल्या दिनांकापासून ३० दिवसात विभागीय आयुक्त यांच्या निर्णयाविरुध्द कंत्राटदार संस्था शासनाकडे अपिल करु शकेल.

२६.३ हमाल कंत्राटदार संस्था यांनी आपल्या तक्रारीचे निराकरण करण्यासाठी उपलब्ध असणाऱ्या वैध मार्गांचा अवलंब केल्याशिवाय त्यांना न्यायालयात दाद मागता येणार नाही.

**२७)** सदर शासन निर्णय वित्त विभागाने अनौपचारिक संदर्भ क्र. ३६०/व्यय १०, दि.०७.१२.२०२२ नुसार दिलेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

**(२८)** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२३०३०६१६५४०२६००६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIJAY BALKRISHNA WAGHMARE

Digitally signed by VIJAY BALKRISHNA WAGHMARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FOOD CIVIL SUPPLIES AND CONSUMER PROTECTION DEPARTMENT,
2.5.4.20=f732949950f551f77488d97adf63b1be835f3a8db6f43554c249546fe680b629,
postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=46023E62FC39A04680C22E8800D4B44643940A8C4975786861 20DE5067362274, cn=VIJAY BALKRISHNA WAGHMARE
Date: 2023.03.06 16:58:11 +05'30'

**( विजय वाघमारे )**
**सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.मंत्री, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव
२) मा.राज्य मंत्री, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव
३) मा. विरोधी पक्ष नेता, विधानसभा / विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
४) प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
५) प्रधान सचिव (कामगार), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) सर्व विभागीय आयुक्त,
७) संचालक, नागरी पुरवठा, पुरवठा आयुक्त कार्यालय, मुंबई
८) सर्व उपायुक्त (पुरवठा), विभागीय आयुक्त, कार्यालय
९) सर्व जिल्हाधिकारी (मुंबई व मुंबई उपनगर जिल्हा वगळून)
१०) सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी
११) उपसंचालक, नागरी पुरवठा, पुरवठा आयुक्तांचे कार्यालय, मुंबई.
१२) उप संचालक, नागरी पुरवठा (गो/वा), मुंबई.
१३) वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.
१४) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
१५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.

१६) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.

१७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.

१८) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, नागरी पुरवठा, लेखा परीक्षा परिमंडळ द्वारा: वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.

१९) वित्त विभाग ( व्यय १०), मंत्रालय, मुंबई.

२०) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग(कामगार-५), मंत्रालय,मुंबई.

२१) निवड नस्ती/नापु-१६अ.

(अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, शासन निर्णय क्रमांक: कंत्राट-१२२१/प्र.क्र.०८/ ना.पु.१६अ, दिनांक ०६ मार्च, २०२३ सोबतचे सहपत्र)

## परिशिष्ट - अ

कार्यकारी दंडाधिकारी, जिल्हा ....................यांचे समोर

**शासकीय गोदाम................. जिल्हा.........येथील अन्नधान्याच्या हाताळणूकीसाठी करावयाच्या हमाल कंत्राटाबाबतचा करारनामा.**

मी (नांव) ................वय/वर्षे.............................धंदा..............

(पत्ता)..........................................................................................सत्य प्रतिज्ञापत्र करतो की,

आमच्या संस्थेचे नांव...............................................................................
रजिस्ट्रेशन नं................................असा आहे. सदर संस्थेला जिल्हाधिकारी..............

यांचेकडून सन ------ ते ------ या कालावधीसाठी ......................या गोदामातील अन्नधान्य हाताळणूकीचे कंत्राट दिनांक ..................... पासून दिनांक .......................पर्यंत देण्याचे ठरले आहे. त्याबाबतचा करार, महाराष्ट्राचे राज्यपाल (यात यापुढे ज्यांचा "शासन" असा उल्लेख करण्यात आलेला आहे) आणि .................संस्था जिचे ............येथे कार्यालय आहे, (यात यापुढे ज्यांच्या "संस्था" असा निर्देश करण्यात आला आहे.) यांच्यामध्ये दिनांक ................रोजी करण्यात आला.

ज्याअर्थी, जिल्हाधिकारी..............(यात यापुढे ज्यांचा "जिल्हाधिकारी" असा निर्देश करण्यात आला आहे) यांनी दिनांक...............रोजी सुरु होणाऱ्या व दिनांक .............रोजी समाप्त होणाऱ्या ३ वर्षाच्या कालावधीसाठी अन्नधान्य आणि इतर विक्रेय वस्तुंच्या बाबतीत हमालीचे काम करण्यासाठी दि. ............ रोजीच्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार निविदा प्रक्रिया राबविली होती व या निविदा प्रक्रियेमध्ये ................ संस्था (यात यापुढे ज्यांचा "संस्था" असा निर्देश करण्यात आला आहे) हे न्युनतम निविदाकार ठरलेले आहेत, त्या अर्थी संस्थेने उक्त हमालीचे काम करण्यास होकार दिला आहे आणि शासनाने संस्थेचा उक्त होकार याखाली संनिविष्ट केलेल्या अटीवर व शर्तीवर स्वीकारला आहे.

त्याअर्थी आता पुढीलप्रमाणे करारनामा करण्यात येत आहे.

१) ........... संस्था यांना कामाच्या बाबीसाठी मंजूर केलेल्या प्रति क्विंटल दरांची **सुची सोबत जोडली आहे.** त्यानुसार त्याचप्रमाणे वेळोवेळी वाढलेल्या महागाई निर्देशांकाच्या दरानुसार देयकांची प्रदाने करण्यात यावीत.

२) .......... संस्थेने महाराष्ट्र माथाडी हमाल व इतर श्रमजिवी कामगार (नोकरीचे नियमन व कल्याण) अधिनियम १९६९ च्या कलम १४ नुसार ------जिल्ह्यातील माथाडी मंडळाकडे मालक म्हणून नोंदणी करुन घेतलेली आहे.

३) ........... संस्था ..............गोदामामध्ये जे माथाडी मंडळाकडील नोंदीत कामगार पूर्वीपासून काम करत आहेत त्यांच्याकडूनच काम करुन घेईल व त्यांना संस्थेचे कामगार म्हणून त्यांची संबंधीत माथाडी मंडळाकडे नोंदणी करेल.

४) संबंधीत माथाडी मंडळाकडे कामगारांच्या मजूरीची रक्कम भरण्याची जबाबदारी संबंधीत कंत्राटदार नोंदणीकृत हमाल कामगार संहकारी संस्था/ हमाल कामगार सदस्य असलेल्या सहकारी संस्था /नोंदणीकृत बेरोजगाराच्या सेवा सहकारी संस्था यांची राहील. नोंदीत हमाल कामगारांना रोखीने हमाली अदा केली जाणार नाही.

५) ........... संस्था नोंदीत हमाल कामगारांची मजूरी प्रत्येक महिन्याच्या ५ तारखेपर्यंत माथाडी मंडळात ऑनलाईन पध्दतीने अथवा धनाकर्षाद्वारे जमा करेल. जिल्हा पुरवठा अधिकारी/ अन्नधान्य वितरण अधिकारी नोंदीत हमाल कामगारांपोटी जिल्हा माथाडी मंडळाने घोषित केलेली लेव्हीची रक्कम प्रत्येक महिन्याच्या १५ तारखेपर्यंत माथाडी मंडळाकडे ऑनलाईन पध्दतीने अथवा धनाकर्षाद्वारे जमा करेल. संस्थेस मजूरीची रक्कम माथाडी मंडळात जमा केल्याबाबतचे प्रमाणपत्र सादर केल्यावर तेवढया रक्कमेची प्रतिपुर्ती जिल्हा पुरवठा अधिकारी करतील.

६) कंत्राटदार संस्थेने मजुरीची रक्कम विहित वेळेत न भरल्यास प्रथम वेळेस संस्थेस लेखी समज देण्यात येईल. द्वितीय वेळी संस्थेने सदरच्या रक्कमेचा भरणा विहित वेळेत न केल्यास नोटीस देऊन संस्थेस देण्यात येणाऱ्या बाबनिहाय आधारभूत दरावरील स्पर्धात्मक दरातून २५% रक्कम दंड म्हणून कपात करण्यात येईल व त्रितीय वेळी संस्थेने सदरच्या रक्कमा विहित वेळेत न भरल्याचे आढळयास संस्थेस नोटीस देऊन कंत्राट रद्द करण्यात येईल.

७) कंत्राटदार संस्थेस हमाल कामगारांना माथाडी मंडळाने ठरवून दिलेल्या आधारभूत दरापेक्षा कमी दर देता येणार नाही. कंत्राटदार संस्थेस मालक म्हणून माथाडी कामगारांच्या मजूरीची रक्कम ही किमान वेतनापेक्षा किंवा मंडळाने ठरवून दिलेल्या दरापेक्षा कमी राहणार नाही.

८) शासकीय गोदामातील अन्नधान्य हाताळणुकीचे काम अत्यावश्यक सेवेमध्ये येत असल्याने, संबंधित कामगारांना संप/काम बंद आंदोलन इत्यादी प्रकारे कामात व्यत्यय आणता येणार नाही. अशा प्रकारे कामात व्यत्यय आणणाऱ्या कामगारांवर कंत्राटदार संस्थेकडून/माथाडी मंडळाकडून तातडीने माथाडी कायद्यातील तरतुदीनुसार कारवाई करण्यात येईल. या संबंधीची सर्व जबाबदारी कंत्राटदार संस्था/माथाडी मंडळाची राहील.

९) शासकीय गोदामातील कामामध्ये सातत्य रहावे, हमालांच्या कमतरतेमुळे/ अनुपस्थितीमुळे काम खोळंबून राहू नये, यासाठी आवश्यक ते हमाल कामगार तात्पुरत्या स्वरुपात तातडीने उपलब्ध करुन देण्याची जबाबदारी हमाल कंत्राटदार संस्थेची राहील.

१०) काही कारणात्सव शासकीय गोदामातील काम कायमस्वरुपी बंद पडल्यास अथवा शासनाने बंद करण्याचा निर्णय घेतल्यास हमालांना काम देण्याची जबाबदारी शासनाची असणार नसुन त्या त्या हमाल कंत्राटदार संस्थेची किंवा माथाडी मंडळाची राहील.

११) कंत्राटदार संस्थेस कंत्राट कालावधीत माथाडी मंडळाच्या नियमातील अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करणे बंधनकारक राहील. ज्या संस्था यांचे काटेकोर पालन करणार नाहीत / शासकीय कामामध्ये अडथळे आणतील त्या संस्थेचे काम तात्काळ बंद करुन करारनामा रद्द करण्यात येईल.

१२) संस्था आपल्या स्वत:च्या कामगारांमार्फत या प्रयोजनासाठी शासनाने राखून ठेवलेल्या किंवा बांधलेल्या गोदामांमध्ये आणि / किंवा शासनाने उघडलेल्या खरेदी केंद्रावर किंवा जेथे शासनास अशी सेवा आवश्यक वाटेल त्या अन्य ठिकाणी माल भरणे व उतरवणे यासह आणि विशेषत: याखाली लिहिलेल्या अनुसूचित वर्णन केलेल्या कामांच्या बाबी आणि त्या प्रत्येक बाबीसाठी माथाडी मंडळाने विनिर्दिष्ट केलेल्या दराने, माल भरण्याचे, उचलण्याचे व तदनुषंगिक व संलग्न काम करील.

**शासन, संस्थेला कामाच्या बाबीनुसार पुढीलप्रमाणे नमूद केलेल्या दरांनी केलेल्या कामासाठी मोबदला देईल. मात्र,**

(१) ४७ किलो ग्रॅम ते ५५ किलो ग्रॅम वजनाच्या गोण्याकरिता विहित केलेल्या कामाच्या बाबींचे पूर्ण दर चुकते केले जातील.

(२) संस्थेला कोणत्याही मजूरीच्या कामाच्या बाबींमध्ये नमूद केलेले कोणतेही काम करण्याची आवश्यकता वाटली नाही तर ती किंवा ते काम तिने कोणत्याही कारणास्तव किंवा अन्यथा केले नाही तर न केलेल्या मजूरीच्या कामासाठी संस्थेला नोटीस दिल्यानंतर मंजूर दरामधून ठराविक प्रमाणात रक्कम कमी करण्यात येईल.

(३) स्वच्छ करणे व रुपांतर करणे या बाबींसाठी असलेल्या दराने भूस कांडयातून सर्व खाद्य धान्य इत्यादी वेगळे करण्यासाठी जिल्हाधिकारी यांना जेव्हा जेव्हा आवश्यक वाटेल तेव्हा तेव्हा संस्था कोणतीही गौण उत्पादने असल्यास ती नुकसानीपासून वाचवण्याचे व ती पुन्हा साफ करण्याचे देखील काम करील.

(४) करार निर्दिष्ट दरांविरुध्द स्पष्टपणे उपबंधित केले नसेल तर त्या दरांमध्ये गोदामाच्या आकारानुसार व जमिनीच्या स्वरुपानुसार त्यांच्या भिन्नतेच्या अधिन राहून गोण्या भरणे, उचलणे, आणि त्यांची सुमारे १६ थर उंचीपर्यंत थप्पी लावणे यांचा समावेश होतो. जिल्हाधिकाऱ्यांच्या स्वेच्छा निर्णयानुसार थप्पी लावण्याची ही उंची वाढवता येईल, संस्थेला विहित केलेल्या दराहून अधिक प्रदान केले जाणार नाही.

(५) संस्था जिल्हाधिकारी यांच्या सुचनेनुसार तसे आवश्यक असेल तर ज्यासाठी दर विहित केलेले नसतील अशा कामाच्या बाबी पार पाडील आणि शासनाची मान्यता घेवून नंतर जिल्हाधिकाऱ्यांनी निश्चित केलेल्या दराने अशा कामासाठी तिला प्रदान करण्यात येईल.

(६) संस्था एकाच गोदामातून एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी किंवा यथास्थिती एकाच ठिकाणामधील एका गोदामातून दुसऱ्या गोदामामध्ये, तिच्या मजुरीच्या कामासाठी आवश्यक असलेली तराजुची तागडी लोखंडी कैची, वजने, ताडपत्र्या, हॉपर यंत्रे, उफण्णी यंत्रे, पोती शिवण यंत्रे, हँगीग हुक,

चाळण्या (मेशेस) आणि अन्य तत्सम उपकरणे किंवा गोदामासाठीची साधन सामग्री वाहून नेईल आणि या कामासाठी ती कोणताही स्वतंत्र मजूरी खर्च मिळण्यास हक्कदार असणार नाहीत.

(७) दिवसाचे काम करण्यात आल्यावर उपरोक्त खंड (६) मध्ये नमूद केलेली हॉपर यंत्रे, पोती शिवण यंत्रे, हँगीग हुक, इत्यादी सारखी मजूरीसाठी लागणारी सर्व अवजारे संस्था संबंधित गोदाम रक्षकाने दाखविल्याप्रमाणे योग्य जागी ठेवील.

(८) मजुरीचे काम सर्वसाधारणपणे सकाळी ८.०० वाजता सुरु होईल आणि सायंकाळी ६.०० वाजता संपेल. परंतु यास गोदाम रक्षक, गोदाम व्यवस्थापक किंवा गोदाम अधिकारी किंवा याबाबतीत जिल्हाधिकाऱ्याने प्राधिकृत केलेल्या अशा अन्य अधिकाऱ्यांच्या स्वेच्छाधिकारात त्या दिवसाच्या गरजेनुसार दिवसा सकाळी काम लवकर सुरु करण्यात येऊन संध्याकाळी उशिरा बंद करण्यात आले तरी अधिक तास काम करण्यात आल्यामुळे बाधा येणार नाही, अशा जादा तासांसाठी अतिकालिक भत्याच्या स्वरुपात अतिरिक्त खर्च चुकता केला जाणार नाही.

संस्थेचे सर्व हमाल विहित वेळेत गोदामात उपस्थित राहतील, याची काळजी कंत्राटदार संस्थेने तसेच गोदामपालाने घ्यावी. या संबंधात तक्रारी प्राप्त झाल्यास कंत्राटदार संस्था व गोदामपाल दोघांवरही जबाबदारी निश्चित करण्यात येईल.

(९) संस्था, तिच्या कामगारांकडून धान्य हाताळताना ते वाया जात नाही, त्याची हानी होत नाही हे पाहील.

(१०) संस्था, जेव्हा आवश्यक वाटेल तेव्हा, अनुकूल मोसमात धान्य स्वच्छ व रुपांतरीत करण्याचे काम गोदामाबाहेर करु शकेल.

(११) संस्था, या व्यवस्थेखाली तिने नेमलेल्या कामगारांना किंवा मजुरांना माथाडी मंडळा मार्फत दर महिन्याचे वेतन नियमितपणे ऑनलाईन पध्दतीने प्रदान होईल आणि संस्थेने तसे करण्यांत कसूर केली तर या कामासाठी संस्थेला देय असलेल्या रकमेतून तात्पुरते प्रदान करुन कामगारांना अग्रीम देण्याचे आणि जिल्हाधिकाऱ्याने केलेल्या अशा सर्व प्रदानांसाठी स्वत: प्रतिपूर्ती करण्याचे स्वातंत्र्य जिल्हाधिकारी यांना असेल.

(१२) संस्था, तिच्या मजुरांना किंवा कामगारांना काम करताना कोणतीही दुखापत झाल्यास किंवा इजा पोहचल्यास त्याकरिता जबाबदार राहील आणि श्रमिक भरपाई अधिनियमाखाली देय असलेली कोणतीही नुकसान भरपाईची रक्कम किंवा नुकसान भरपाईच्या रकमा चुकत्या करण्यास जबाबदार असेल. उक्त अधिनियमाअन्वये अशी कोणतीही नुकसान भरपाई जिल्हाधिकारी यांना चुकती करावी लागल्यास संस्था मागणी केल्यावर जिल्हाधिकारी यांना अशा प्रकारे चुकत्या केलेल्या सर्व रकमा परत करील अणि शासनाकडे अशा सर्व दाव्यांची व खर्चाची पूर्णत: क्षतिपूर्ती करील.

(१३) या करारनाम्यातील अटींचे व शर्तीचे योग्य पालन व अनुपालन करण्यासाठी, संस्था जिल्हाधिकारी यांना एकतर शासन निर्णयातील तरतूदीनुसार अनामत रक्कम व प्रतिभूती ठेव कोषागारात रोख रकमेत किंवा शासकीय वचन पत्राद्वारे जमा करील. संस्थेकडून या करारनाम्यातील कोणत्याही अटींचा व शर्तीचा भंग झाल्यास, शासनाला (हा करार समाप्त करण्यासह) इतर कोणत्याही

कायदेशीर उपायांना बाधा न येता, अशा उल्लंघनाबद्दल किंवा या करारानुसार शासनाने किंवा शासनाच्या वतीने संस्थेकडून किंवा तिच्या नावाने केलेल्या किंवा कोणत्याही वेळी करण्यात येतील अशा कोणत्याही इतर मागण्यांच्या पूर्ततेसाठी किंवा त्या बाबतीत शासनाच्या किंवा या अन्वये शासनाला देय असलेल्या कोणत्याही रक्कमेची पूर्तता करण्यासाठी शास्ती किंवा निर्धारीत भरपाई म्हणून अमानत ठेवीची प्रतिपूर्वी ठेवीची संपूर्ण रक्कम किंवा तिचा भाग समपह्रत किंवा समायोजित न करण्यात आलेली अशी ठेव किंवा तिचा भाग हा करार समाप्त झाल्यानंतर संस्थेला चुकता किंवा हस्तांतरीत करण्यात येईल.

(१४) संस्था, या कराराअन्वये तिने हाती घेतलेले मजुरीचे काम त्या त्या दिवशी तत्परतेने पार पाडील आणि हे काम संस्थेमुळे कोणत्याही प्रकारे थांबल्यास किंवा तिच्या श्रमिकांनी हे काम करण्यास नकार दिल्यामुळे किंवा तिच्या नियंत्रणाबाहेर नसलेल्या कोणत्याही कारणांमुळे या कामास विलंब झाल्यास, जिल्हाधिकारी यांच्या संस्थेकडून अशा विलंबामुळे किंवा कसुरीमुळे किंवा इतर उपाययोजना करण्याच्या जिल्हाधिकारी यांच्या अधिकाराला बाधा न आणता जिल्हाधिकारी यांना ज्या पर्यायी व्यवस्था कराव्या लागतील त्या व्यवस्थांवरील कोणत्याही अतिरिक्त खर्चामुळे झालेल्या हानीची कोणतीही रक्कम वसुल करण्याचा अधिकार असेल. अशा प्रसंगी जिल्हाधिकारी शास्तीच्या स्वरुपात आणि शासनाला झालेली हानी भरुन काढण्यासाठी अनामत/प्रतिभूती ठेव किंवा तिचा कोणताही भाग जप्त करील. जिल्हाधिकारी शास्ती व नुकसान भरपाईची रक्कम निश्चित करील आणि संस्थेला अशा शास्तीच्या व नुकसान भरपाईच्या रक्कमा कळवल्यानंतर ती लगेचच आवश्यक ते आणखी प्रदान किंवा प्रदाने करुन ठेव रुपये......... च्या मुळ रक्कमेत पुन्हा ठेवील.

(१५) हा करार दि. ......... पासून दि. ....... पर्यंत तीन वर्षाच्या कालावधीसाठी अमलात राहील. परंतु जिल्हाधिकारी यांना कोणत्याही कारणास्तव संस्थेला एक महिन्याची लेखी नोटीस देवून हा करार समाप्त करता येईल आणि अशा समाप्तीच्या वेळी संस्थेला नुकसान भरपाईसाठी दावा करता येणार नाही.

(१६) याद्वारे परस्परांमध्ये असे मान्य करण्यात येत आहे की, जिल्हाधिकारी यांना वाटत असेल तर ते त्यांच्या स्वेच्छाधिकारात संस्थेला येथील खंड (१५) नुसार कामाच्या शेवटच्या दिवसापूर्वी तिला वाढवून दिलेल्या कालावधीच्या पलीकडे दोन महिन्यांहून अधिक नसलेल्या अतिरिक्त कालावधीसाठी येथे दिलेल्या संस्थेच्या अटीनुसार व दरांनुसार काम करण्यास सांगू शकेल.

(१७) जर संस्थेला किंवा तिच्या अधिकृत प्रतिनिधीस जीवनावश्यक सेवा अधिनियम १९५५ मधील तरतुदीनुसार अपराधी ठरविले असेल तर जिल्हाधिकारी त्यांच्या स्वेच्छाधिकारात नोटीस न देता कंत्राट समाप्त करील आणि अशा प्रकारे कंत्राट समाप्त केल्यामुळे संस्थेला जिल्हाधिकाऱ्यांकडून कोणतीही नुकसान भरपाई मिळणार नाही.

(१८) जिल्हाधिकारी त्याच्या स्वेच्छाधिकारात संस्थेची कसूर, गैरवर्तणूक इत्यादी कारणामुळे देखील कंत्राट विखंडीत करु शकेल आणि अशा प्रकारे कंत्राट विखंडीत केल्यामुळे संस्थेला कोणतीही नुकसान भरपाई मिळणार नाही.

(१९) शासकीय गोदामामध्ये अन्नधान्याच्या प्रमाणिकरणामध्ये प्रत्येक गोणी ही ५० किलोची बनविली जाते. सदर प्रमाणिकरणाच्या अचुकतेबाबत कंत्राटदार संस्थाही जबाबदार राहील. यासाठी L रजिस्टर, E रजिस्टर व E-१ रजिस्टरवर संस्थेचा सुपरवायझर/लिपिक/संस्थेने नियुक्त केलेली व्यक्ती सही करील.

(२०) लवाद अधिनियम, १९४० च्या उपबंधाद्वारे या करारनाम्यातील तरतुदी संदर्भात कोणताही वाद/विवाद उद्भवल्यास संबंधित विभागीय आयुक्तांकडे करारनामा समाप्त झाल्यापासुन सहा महिन्याच्या आत दाद मागता येईल. अशा लवादाचा निर्णय अंतिम व या कराराच्या दोन्ही पक्षांना बंधनकारक राहील.

(२१) शासनाला देय असलेल्या किंवा ज्या दिनांकास शासनाला ही रक्कम प्रदान करावयाची होती त्या दिनांकापासून दरसाल ६% व्याजासह या कंत्राटाअन्वये शासनाकडून वसुली योग्य असलेल्या सर्व रक्कमा शासनाचे कोणतेही इतर हक्क आणि उपाययोजना यास बाधा न आणता जमीन महसूलाची थकबाकी म्हणून वसुली योग्य असलेल्या मानण्यात येतील.

(२२) या लेखाच्या संबधातील मुद्रांक शुल्क संस्था भरेल व ती ते चुकते करील.

(२३) जिल्हाधिकारी यांनी दिलेल्या सूचनांचे पालन करण्यास संस्थेने कसूर केल्यास जिल्हाधिकारी किंवा त्याने प्राधिकृत केलेला अधिकारी यांनी संस्थेस लेखी स्वरुपात रीतसर नोटीस दिल्यानंतर संस्थेच्या जोखिमीवर, खर्चाने व अनुभवावर अन्य दुसऱ्या संस्थेमार्फत किंवा अन्य कोणत्याही एजन्सीमार्फत पर्यायी व्यवस्था करील आणि याकरिता शासनाला झालेला सर्व अतिरिक्त खर्च हा संस्था सोशील व चुकता करील.

**१०) वर निर्दिष्ट केलेल्या मजूरीच्या कामाच्या बाबींची अनुसूची:**

**प्रत्येकी १ क्विंटल साठीचे दर**

**(अ) धान्याचे प्रमाणिकरण करणे.**

(एक) ट्रक/गाडयांमध्ये रचून ठेवलेल्या गोण्याची थप्पी मोडून त्या गोण्या वजन काटयाजवळ नेणे, प्रमाणिकरणामध्ये गोण्यांमध्ये धान्य घालून किंवा गोण्यांमधून धान्य काढून वजन करणे, गोण्या हलवणे, प्रमाणिकृत गोण्या शिवणे आणि अंदाजे १६ थरांपर्यंत थप्पी लावून रचणे.

(दोन) गोदामामध्ये रचून ठेवलेल्या गोण्याची थप्पी मोडून त्या गोण्या वजन काटयाजवळ नेणे, प्रमाणिकरणामध्ये गोण्यांमध्ये धान्य घालून किंवा गोण्यांमधून धान्य काढून वजन करणे, गोण्या हलविणे, प्रमाणिकृत गोण्या शिवणे आणि अंदाजे १६ थरांपर्यंत थप्पी लावून रचने किंवा ट्रकमध्ये/गाड्यांमध्ये वाहून नेवून थप्पी रचणे.

(तीन) (दोन) साठी जसे त्याचप्रमाणे पाला न करता पुन्हा गोण्यांमध्ये भरणे, म्हणजे थप्पी रचून ठेवलेल्या गोण्या खाली उतरवणे, त्यातील धान्य नवीन गोण्यांमध्ये ओतणे, अचुक वजन करणे, गोण्याची तोंड शिवणे आणि त्याच गोदामामध्ये अंदाजे १६ थरांपर्यंत थप्पी लावून रचने किंवा ट्रकमध्ये/गाड्यांमध्ये वाहून नेवून थप्पी रचणे.

**(ब) गोदामामध्ये गोण्या भरणे, उतरवणे आणि थप्पी लावणे.**

(एक) गाडीमधून किंवा ट्रक्समधून गोण्यांची थप्पी मोडून खाली उतरवणे आणि वजन न करता, परंतु सर्व भारासहीत उचलणे या कामासह अंदाजे १६ थरांच्या उंचीपर्यंत गोदामांमध्ये थप्पी रचून ठेवणे.

(दोन) गोदामात लावलेल्या थप्पीवरुन गोण्या काढणे, त्यांचे वजन न करता सर्व भारासहीत त्या उचलणे व गोदामाजवळच्या ट्रकमध्ये/गाड्यांमध्ये वाहून नेवून थप्पी रचणे.

(तीन) गाड्यांमधून किंवा ट्रकमधून गोण्यांची थप्पीमोडून खाली उतरवणे, गोण्यांचे वजन करणे आणि गोदामात अंदाजे १६ थरांच्या थप्पी रचून ठेवणे.

(चार) गोदामातील थप्पी वरुन गोण्या काढणे, त्यांचे वजन करणे व ट्रकमध्ये किंवा गाड्यांमध्ये नेवून थप्पी रचणे.

(पाच) गोदामातील थप्पीवरुन गोण्या काढणे, वजन न करता किरकोळ विक्रेते / घाऊक व्यापारी यांना देण्यासाठी ट्रकमध्ये किंवा गाड्यांमध्ये नेवून थप्पी रचणे.

टीप :- उपरोक्त (पाच) बाबतीत किरकोळ विक्रेते/घाऊक व्यापारी यांच्या गाड्यांमध्ये माल भरताना त्या मालाची जबाबदारी किरकोळ विक्रेते/घाऊक व्यापारी यांच्यावर आहे.

(सहा) वाराफेरी (कोणत्याही कारणास्तव पुनर्व्यवस्था किंवा एकाच इमारतीमधील गोदामांमध्ये वजन न करता गोण्या रचण्याकरिता अन्य कोणतीही हलवाहलव)

टीप :- पडलेले धान्य झाडणे इत्यादी काम शासनाने नेमलेल्या पालावाल्याकडून करुन घेण्यात यावे.

**(क) गोदामामधील इतर कामकाज :**

(एक) स्थानिक भागातून धान्य खरेदी करताना शेतकऱ्यांकडून किंवा इतर पुरवठादाराकडून धान्य घेण्यासाठी गोण्या देणे, त्या भरुन तागडीजवळ नेणे, वजन करणे, प्रमाणीकरण करणे, शिवणे आणि गोदामामध्ये अदमासे सोळा थर इतक्या उंच थप्पी रचून ठेवणे.

(दोन) इतर कामासाठी गोण्या नेण्याची आवश्यकता असल्यास, प्रत्येकी एक क्विंटल (निव्वळ) इतके प्रत्यक्ष वजन केलेल्या १०० गोण्यांमागे......... (प्रमाणीकरण केलेल्या गोण्या) वजनाची चाचणी घेणे.

टीप : वजनाच्या चाचणीसाठीचा हा दर गोण्या थप्पीने रचणे किंवा खाली उतरवणे इत्यादी सारख्या कोणत्याही गौण कामाकरिता विचारात घेतला जाणार नाही.

(तीन) थप्पीवरुन गोण्याखाली उतरवणे व त्या तेथून हलवणे, त्यातील धान्य नवीन गोण्यांमध्ये ओतून त्या रिकाम्या करणे, त्या शिवणे आणि त्या थप्पीने रचून ठेवणे,

**(ड) कामांच्या इतर संकीर्ण बाबी:**

(एक) वाधिणीमधून रिकाम्या गोण्यांच्या गासड्या किंवा गठ्ठे किंवा सुतळीच्या गासड्या/दोऱ्याचे पॅकेट (प्रत्येकी ३१८ ते ४०९ कि. ग्रॅ.) उतरवणे आणि थेट ट्रक्समध्ये किंवा गाडयांमध्ये भरणे.

(दोन) ट्रक्समधून किंवा गाडयांमधून (प्रत्येकी ३१८ ते ४०९ कि. ग्रॅ.) रिकाम्या गोण्यांच्या गासड्या किंवा गोण्यांचे गठ्ठे किंवा सुतळीच्या गासड्या/ दोऱ्याचे पॅकेट उतरवणे आणि गोदामामध्ये थप्पीने रचणे.

(तीन) १०० रिकाम्या गोण्या व्यवस्थीत बांधून त्याचे गठ्ठे तयार करणे आणि ते गोदामामध्ये थप्पीने रचणे.

(चार) ताडपत्र्या गोदामामध्ये ठेवणे.

(पाच) ताडपत्र्या गोदामामधून बाहेर काढणे.

(सहा) एकाच गोदामामध्ये रिकाम्या गोण्याचे गठ्ठे इकडून तिकडे नेण्यासाठी वाराफेरी.

या गोष्टीची साक्ष म्हणून महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्यासाठी व त्यांच्या वतीने सही करण्यासाठी व त्यांच्या कार्यालयाची मोहोर लावण्यासाठी जिल्हाधिकारी यांना प्राधिकृत केले आहे आणि वरील संस्थेची सामाईक मोहोर यात वर लिहिलेल्या दिवशी व वर्षी उमटविली आहे.

जिल्हाधिकारी यांनी खालील व्यक्तींच्या समक्ष, महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या नांवाने व वतीने स्वाक्षरीत मोहोरबंद करुन स्वाधीन केले.

वरीलप्रमाणे

करारनामा लिहून घेणार
(जिल्हाधिकारी)

करारनामा लिहून देणार
(संस्थेचे चेअरमन अथवा प्राधिकृत प्रतिनिधी)

साक्षीदार-( जिल्हा पुरवठा कार्यालयाच्या वतीने)

१)

२)

संस्थेने खालील व्यक्तींच्या समक्ष स्वाक्षरीत व मोहोरबंद करुन स्वाधीन केले.
साक्षीदार

१)

२) ................